रोजगार व स्वयंरोजगार यंत्रणेतील रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन अधिकारी,गट-ब या पदावर (सरळसेवा भरती) नियुक्ती देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## रोजगार व स्वयंरोजगार विभाग

## शासन निर्णय क्रमांकः इएसई-२०१३/प्र.क्र.६४ /प्रशा-२

जी. टी. रुग्णालय संकुल, ५ वा मजला,

नवीन मंत्रालय, मुंबई-४००००१.

दिनांक : २२ जुलै, २०१४

वाचा :-

१) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, अधिसूचना क्रमांक एसआरव्ही-२०१०/ प्र.क्र.१/१२, दिनांक ०८/०६/२०१०

२) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र.१८४४/(३)/३/सात, दिनांक ३०/०३/२०१३.

३) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र.१८४४/(३)(३)/सात, दिनांक ३०/०९/२०१३.

४) शासन निर्णय, रोजगार व स्वयंरोजगार विभाग, क्रमांक इएसई-२०१३/ प्र.क्र.६४/प्रशा-२, दिनांक १६ डिसेंबर, २०१३.

५) शासन निर्णय, रोजगार व स्वयंरोजगार विभाग, क्रमांक इएसई-२०१३/ प्र.क्र.६४/प्रशा-२, दिनांक ०१ मार्च, २०१४.

शासन निर्णय :-

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संदर्भाधीन क्रमांक २ व ३ च्या पत्रान्वये शिफारस केलेल्या रोजगार व स्वयंरोजगार विभागातील रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन अधिकारी, गट-ब संवर्गातील ३५ उमेदवारांपैकी २८ उमेदवारांना विभागाच्या संदर्भाधिन क्रमांक ४ व उर्वरित ७ उमेदवारांपैकी ५ उमेदवारांना विभागाच्या संदर्भाधीन क्र.५ च्या शासन निर्णयान्वये नियुक्ती देण्यात आली आहे. उर्वरित दोन उमेदवारांपैकी शैक्षणिक अर्हता, अनुभव प्रमाणपत्रे, वैद्यकीय तपासणी, चारित्र्यपूर्व तपासणी, जात प्रमाणपत्र व शासन सेवेतील उमेदवारांचे गोपनीय अहवाल इत्यादी बाबींची तपासणी पूर्ण झालेल्या श्री.रविंद्र प्रकाश सुरवसे यांना रोजगार व स्वयंरोजगार विभागात रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन अधिकारी, गट-ब (वेतनश्रेणी रु. ९३००-३४८०० ग्रेड वेतन रु. ४४००) या पदावर महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम, १९८१ मधील नियम ९ (४२) मध्ये विहित केलेल्या परिविक्षाधीन या संज्ञेच्या व्याख्येनुसार परिविक्षाधीन म्हणून तात्पुरती नियुक्ती करण्यात येत आहे.

२. नियुक्त उमेदवाराचे नाव व रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन अधिकारी, गट-ब या पदावरील पदस्थापनेचे ठिकाण खालीलप्रमाणे आहे :-

| अनु.क्र. | गुणवत्ता क्रमांक | उमेदवाराचे नाव व संपूर्ण पत्ता | सा.प्र.वि.च्या अधिसूचनेनुसार वाटप करण्यात आलेला विभागीय संवर्ग | पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|
| १ | २५ | श्री. रविंद्र प्रकाश सुरवसे<br>रु.नं.३, कृष्णा सुरवसे चाळ,<br>सी.के.पी.कॉलनी जवळ, एक्सर रोड,<br>बोरिवली (प), मुंबई. ४०० ०९१ | कोकण | जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्र, मुंबई उपनगर |

उपरोक्त नियुक्ती देण्यात आलेल्या उमेदवाराचा परिविक्षा कालावधी २ वर्षांचा राहील. सदर उमेदवाराची पहिली वेतनवाढ त्यांचा १ वर्षाचा परिविक्षा कालावधी पूर्ण झाल्यानंतर व त्यानंतरची वेतनवाढ त्यांनी परिविक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केल्यानंतर देण्यात येईल.

३. वरील उमेदवाराची रोजगार व स्वयंरोजगार विभागातील रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन अधिकारी, गट-ब मधील नियुक्ती ही २ वर्षाचा परिविक्षाधीन काळ समाधानकारकरित्या पूर्ण करण्याच्या व खालील विहित अटी व शर्तीच्या अधीन असेल.

१) महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, १९८२ व त्यामध्ये वेळोवेळी करण्यात येणा-या सुधारणांच्या अधीनतेने त्यांची ज्येष्ठता राहील.

२) वरील उमेदवाराने त्यांच्या नियुक्तीच्या आदेशाच्या दिनांकापासून १ महिन्याच्या आत रुजू व्हावयाचे आहे. काही अपरिहार्य कारणास्तव त्यांना रुजू होण्यास मुदतवाढ हवी असल्यास तसे सकारण लेखी कळवून मुदतवाढ घेणे आवश्यक आहे. अन्यथा, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या परिक्षेतील गुणानुक्रमानुसार त्यांना ज्येष्ठता मिळणार नाही व ते हजर होतील त्या दिनांकापासून त्यांची ज्येष्ठता धरण्यात येईल.

३) जर उमेदवाराच्या जात वैधता प्रमाणपत्रामध्ये काही तांत्रिक मुद्यांची पुर्तता करण्याच्या अधिन राहून वैधता प्रमाणपत्र दिल्याबाबतचा उल्लेख नमूद असेल तर त्या तांत्रिक मुद्यांची पूर्तता तात्काळ करणे उमेदवारांवर बंधनकारक राहील. यामध्ये झालेला/होणारा विलंब हा

उमेदवाराची सदर पदावरील नियुक्ती रद्दबातल करण्यास कारणीभूत ठरेल, याची सर्व उमेदवारांनी नोंद घ्यावी.

४) उपरोक्तप्रमाणे नियुक्ती देण्यात आलेल्या उमेदवाराने सेवा प्रवेश नियमानुसार विभागामार्फत आयोजित केल्या जाणाऱ्या विभागीय परिक्षा, प्रादेशिक भाषा परिक्षा, संगणक परिक्षा विहित मुदतीत उत्तीर्ण होणे आवश्यक राहील. तसेच विहित नियमानुसार विभागांतर्गत वेळोवेळी आयोजित करण्यात येणाऱ्या इतर परिक्षा परिविक्षा कालावधीच्या २ वर्षांच्या विहित मुदतीत उत्तीर्ण होणे आवश्यक राहील.

५) परिविक्षाधीन अधिकाऱ्यानी कामाचा अपेक्षित दर्जा प्राप्त न केल्यास किंवा विहित विभागीय लेखा परिक्षा परिविक्षा कालावधीत उत्तीर्ण न केल्यास अथवा त्यांची वर्तणूक अयोग्य, संशयास्पद आढळल्यास तो/ती कोणतीही पूर्व सूचना न देता सेवेतून कमी करण्यास पात्र ठरेल.

६) वरील उमेदवार त्यांच्या सेवेचा राजीनामा देऊ इच्छित असतील त्यांनी शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एसआरव्ही १०९२/१०३३/प्र.क्र.३३/९२/८, दिनांक ०२/१२/१९९७ मधील तरतुदीनुसार शासनास किमान १ (एक) महिन्याची आगाऊ नोटीस देणे आवश्यक राहील. तसेच, या उमेदवाराची सेवा समाप्त करावयाची असेल त्यावेळी शासनाकडूनही अशी एक महिन्याची आगाऊ नोटीस संबंधित अधिका-यास दिली जाईल. मात्र, गैरशिस्त, सेवा नियमांचा भंग इ.कारणासाठी सेवा समाप्त करताना वरील उमेदवारास नोटीस देण्याचे शासनास बंधनकारक राहणारी नाही. हे नियम यानंतर वेळोवेळी होणा-या नियमातील बदलाच्या अधीन राहतील.

७) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अनियो १००५/१२६/सेवा-४, दिनांक ३१/१०/२००५ मधील तरतुदीनुसार दिनांक १ नोव्हेंबर, २००५ रोजी किंवा त्यानंतर ज्या अधिकारी/कर्मचारी यांची शासकीय सेवेत नियुक्ती होईल त्यांना नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू ठरेल. सद्या अस्तित्वात असलेली निवृत्ती वेतन योजना म्हणजेच महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ व महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतनाचे अंश राशीकरण) नियम, १९८४ आणि सद्या अस्तित्वात असलेल्या सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना या उमेदवारांना लागू ठरणार नाही. मात्र, श्री.सुरवसे हे दिनांक १ नोव्हेंबर, २००५ पूर्वी शासन सेवेत निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेवर कार्यरत असतील जर त्यांना शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अनियो-१००६/८७/सेवा-४, दिनांक १२/०१/२००७ मध्ये नमूद केलेल्या अटींच्या

पूर्ततेच्या अधीन राहून महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू राहील.

८) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक बीसीसी-२०११/प्र.क्र.१०६४/२०११/१६ब, दिनांक १२ डिसेंबर, २०११ मधील तरतूदीनुसार सरळसेवा भरतीमध्ये ज्या उमेदवारांची निवड विशिष्ट मागास प्रवर्गासाठी आरक्षित असलेल्या जागांवर झालेली आहे व ज्यांनी नियुक्तीपूर्वी शासनाकडे जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेले नाही अशा उमेदवारास त्यांच्या जात वैधता प्रमाणपत्राची वैधता तपासण्याच्या अधीन राहून तात्पुरती नियुक्ती देण्यात येत आहे. नियुक्ती आदेश प्राप्त झाल्यानंतर अशा उमेदवाराने नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून सहा महिन्याच्या आत आपल्या जात प्रमाणपत्राची वैधता संबंधित जात पडताळणी समितीकडून करून घेणे आवश्यक राहिल. सर्व संबंधित उमेदवारांनी नियुक्ती स्विकारताच जात वैधता तपासणी करण्यासाठी प्रस्ताव संबंधित जात पडताळणी समितीकडे सादर करावा व जात पडताळणी समितीने दिलेल्या पोचपावतीची साक्षांकित प्रत नियुक्ती प्राधिकाऱ्यास सादर करावी. मा. उच्च न्यायालयाने दिलेल्या निर्देशानुसार संबंधित जात पडताळणी समितीने त्यांचे पडताळणी प्रस्ताव सहा महिन्याच्या आत निकाली काढावेत. जात पडताळणी समितीने जात प्रमाणपत्र अवैध ठरविले तर संबंधित उमेदवारास दिलेले नियुक्तीचे आदेश त्वरीत रद्द करावेत आणि त्या उमेदवाराविरुद्ध नियुक्ती प्राधिकाऱ्याने महाराष्ट्र अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागास वर्ग व विशेष मागास प्रवर्ग (जातीचे प्रमाणपत्र देण्याचे व त्यांच्या पडताळणीचे विनियमन) अधिनियम, २००० मधील तरतूदीनुसार त्वरीत कारवाई करावी. याअनुषंगाने आवश्यक ती कार्यवाही करण्याची जबाबदारी आयुक्त, रोजगार, स्वयंरोजगार व कौशल्य विकास, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय, कोकण भवन, नवी मुंबई यांची राहील. सर्व संबंधित उमेदवारांनी नियुक्तीच्या पदावर रुजू होताच जात वैधता तपासणीचा प्रस्ताव संबंधित जात पडताळणी समितीकडे सादर करणे बंधनकारक राहील.

९) सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना क्र.एसआरव्ही २०१०/प्र.क्र.१/१०/१२, दिनांक ०८/०६/२०१० अन्वये सरळसेवेने नियुक्तीसाठी महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर विभागीय संवर्ग व विभागीय संवर्ग वाटप नियमावली तयार करण्यात आली असून त्यानुसार उपरोक्त उमेदवारांना विभागीय संवर्ग वाटप करण्यात आले आहेत. सदर अधिसूचनेतील तरतुदीनुसार गट-ब संवर्गात नियुक्त झालेल्या

उमेदवारांना वाटप झालेल्या विभागीय संवर्गात किमान ९ वर्षे इतका कालावधी पूर्ण करणे आवश्यक राहील. त्याअनुषंगाने उपरोक्त उमेदवारांना वाटप करण्यात आलेल्या महसुली विभागीय संवर्गात ९ वर्षे सेवा करणे आवश्यक राहील.

१०) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या उपरोक्त उमेदवाराची रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन अधिकारी, गट-ब या संवर्गातील पदावर सा.प्र.वि.च्या दिनांक ०८/०६/२०१० च्या अधिसूचनेतील तरतुदीच्या पूर्ततेनंतर महाराष्ट्रात कोणत्याही ठिकाणी बदली करण्यात येईल.

११) उपरोक्त उमेदवाराची मूळ प्रमाणपत्रे तसेच, मागासप्रवर्गासाठी आरक्षित झालेल्या जागांवर नियुक्ती करण्यात आलेल्या उमेदवारांची जात प्रमाणपत्रे, जात वैधता प्रमाणपत्रे, आयुक्त, रोजगार, स्वयंरोजगार व कौशल्य विकास, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय, कोकण भवन, नवी मुंबई यांनी तपासून घ्यावीत. तसेच, उपरोक्त उमेदवारांपैकी जे शासकीय कर्मचारी म्हणून कार्यरत असतील त्यांचे यापूर्वीचे मूळ गोपनीय अभिलेख नियुक्तीपूर्वी तपासून घ्यावेत.

१२) रोजगार व स्वयंरोजगार यंत्रणेतील श्री.र.शं.पवार, जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन अधिकारी उस्मानाबाद यांनी महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, नागपूर खंडपीठ येथे रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन अधिकारी यांच्या ज्येष्ठतासूचीबाबत दाखल केलेल्या मूळ अर्ज क्रमांक ५९३/९८ मधील अवमान याचिका क्रमांक ७/२०११ मधील अंतिम निकालाच्या अधीन उपरोक्त उमेदवारांची ज्येष्ठता निश्चित केली जाईल.

१३) उपरोक्त उमेदवाराने शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.सीडीआर-१०८७/१७८१/५०-अकरा, दिनांक २४ नोव्हेबर,१९८८ नुसार मत्ता व दायित्वाबाबतचे विवरणपत्र आयुक्त, रोजगार, स्वयंरोजगार व कौशल्य विकास, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय, कोकण भवन, नवी मुंबई यांना सादर करावे.

४. उपरोक्त नमूद अटी व शर्तींचे तंतोतंत पालन करण्याची जबाबदारी आयुक्त, रोजगार, स्वयंरोजगार व कौशल्य विकास, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय, कोकण भवन, नवी मुंबई यांची राहील. तसेच उपरोक्त सर्व परिविक्षाधीन रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन अधिकारी, गट-ब संवर्गातील अधिका-यांना शासन निर्णय क्रमांक टीआरएन-०९/प्र.क्र.३९/०९/१२-अ दिनांक २३ सप्टेंबर, २०११ नुसार पायाभूत व इतर सर्व प्रशिक्षण तसेच, सदर संवर्गाचे सेवाप्रवेश नियम व इतर सर्व महत्वाचे सेवाप्रवेश नियम आणि रोजगार व स्वयंरोजगार यंत्रणेतील कार्यालयीन कामकाज बाबत

प्रशिक्षण देण्याची कार्यवाही आयुक्त, रोजगार, स्वयंरोजगार व कौशल्य विकास, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय, कोकण भवन, नवी मुंबई यांनी करावी.

५. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने श्री.गजानन बाळासाहेब टोम्पे (अराखीव) यांचेऐवजी श्री रविंद्र प्रकाश सुरवसे, अ.जा. यांची आराखीवच्या पदाकरिता नियुक्तीसाठी प्रतिक्षायादीतून गुणवत्तेनुसार शिफारस केली असल्याने श्री टोम्पे यांची नियुक्ती या आदेशान्वये संपुष्टात आणण्यात येत आहे. तसेच, श्री.सुरवसे यांचा गुणवत्ता क्रमांक २५ असा राहील.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०७२२१४३००५७४०३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anand Sajjan Ramteke

Digitally signed by Anand Sajjan Ramteke
DN: c=IN, o=Government of maharashtra, ou=ESE, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Anand Sajjan Ramteke
Date: 2014.07.22 14:28:57 +05'30'

(आनंद स. रामटेके)

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मंत्री (रोजगार व स्वयंरोजगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.राज्यमंत्री (रोजगार व स्वयंरोजगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र १, मुंबई,
४. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
५. आयुक्त, रोजगार, स्वयंरोजगार व कौशल्य विकास, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय, कोकण भवन, नवी मुंबई,
६. सह सचिव, सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-१२), मंत्रालय, मुंबई,
७. उपसंचालक, रोजगार व स्वयंरोजगार, विभागीय मुख्यालय,कोकण भवन, नवी मुंबई.
८. अधिदान व लेखाधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, बांद्रा, मुंबई.
९. संबंधित अधिकारी.
१०.निवड नस्ती.